**“Tech-वारी”- प्रशिक्षण कार्यक्रमासाठी येणाऱ्या केंद्र शासकीय अधिकाऱ्यांना “राज्य अतिथी” घोषित करणेबाबत.**

**महाराष्ट्र शासन**
**सामान्य प्रशासन विभाग**
**शासन परिपत्रक क्रमांकः संकीर्ण-२०२४/प्र.क्र.१२१/प्रशि-४**
हुतात्मा राजगुरु चौक, मादाम कामा मार्ग,
मंत्रालय, मुंबई - ४०० ०३२
दिनांक : ०६ मे, २०२५

## परिपत्रक

राज्यातील सर्व शासकीय कर्मचाऱ्यांची आधुनिक तंत्रज्ञानामध्ये क्षमता वृद्धींगत करण्यासाठी दिनांक ५ ते ९ मे, २०२५ दरम्यान मंत्रालय, मुंबई येथे “Tech-वारी” या विशेष प्रशिक्षण कार्यक्रमाचे आयोजन करण्यात येणार असून सदर कार्यक्रमाचे स्वरूप पुढीलप्रमाणे असेल :-

- कृत्रिम बुद्धिमत्ता, ब्लॉकचेन, इंटरनेट ऑफ थिंग्ज, सायबर सुरक्षा इत्यादी विषयांवर तज्ञांची सत्रे.
- वैयक्तिक व प्रशासकीय कार्यक्षमता विकसित करण्यासाठी आधुनिक तंत्रज्ञानाबाबतची कार्यशाळा.
- तणाव व्यवस्थापन, निरोगी जीवन पद्धती, ध्यानधारणा इत्यादी विचारमंथन सत्रे.

२. “Tech-वारी” या कार्यक्रमामध्ये केंद्र शासनातील श्रीमती अलका मित्तल, कॅपसिटी बिल्डींग कमिशन, नवी दिल्ली या वरिष्ठ अधिकारी उपस्थित राहणार आहेत. त्यांच्या उपस्थितीमुळे सदर कार्यक्रम प्रभावीपणे राबविण्यास राज्य शासनास मदत होणार आहे. सदर बाब विचारात घेता, त्यांना दि. ०६.०५.२०२५ व दि. ०७.०५.२०२५ या कालावधीकरीता “राज्य अतिथी” म्हणुन घोषित करण्यात येत आहे.

३. श्रीमती अलका मित्तल यांना राज्य अतिथी घोषित करण्याबाबत तसेच त्यांना राजशिष्टाचार सुविधा (आगमन व निर्गमन प्रसंगी स्वागताची व्यवस्था, वाहन व्यवस्था, निवास व्यवस्था) देण्याबाबत राजशिष्टाचार विभागाने कार्यवाही करावी.

४. श्रीमती अलका मित्तल यांच्या राजशिष्टाचार सुविधेसाठी होणारा खर्च सामान्य प्रशासन विभागांतर्गत “मागणी क्र. ए-४, २०७०-इतर प्रशासकीय सेवा ०० - ००३ - प्रशिक्षण ०० - १० - राज्य प्रशिक्षण कार्यक्रम राबविण्यासाठी विविध सुविधा व सहाय यावरील खर्च (२०७० ०८५३) ३१ सहायक अनुदान (वेतनेतर)” या लेखाशिर्षाखाली सन २०२५-२६ या आर्थिक वर्षामध्ये केलेल्या तरतूदीमधून भागविण्यात येईल.

५. सदर शासन परिपत्रक महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आले असून त्याचा संकेताक २०२५०५०६१११४०८४७०७ असा आहे. हे परिपत्रक डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

GEETA RAHUL KULKARNI

Digitally signed by GEETA RAHUL KULKARNI
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=GENERAL ADMINISTRATION DEPARTMENT, 2.5.4.20=87e2e317e0d978442ac6b599d6a0abcf73fe717ee5299 4443a8509075101cc93, postalCode=400032, st=Maharashtra, serialNumber=92D474843B842720200D1A10946D5FC9348B94 50F867605A47D177207C9BD384, cn=GEETA RAHUL KULKARNI
Date: 2025.05.06 12:55:00 +05'30'

**(गीता कुलकर्णी)**
**सह सचिव, महाराष्ट्र शासन**

**प्रत,**

१. मुख्य सचिव, यांचे वरिष्ठ स्वीय सहायक, सामान्य प्रशासन विभाग, मंत्रालय, मुंबई-३२,
२. अपर मुख्य सचिव ( सेवा ), यांचे वरिष्ठ स्वीय सहायक, सामान्य प्रशासन विभाग, मंत्रालय, मुंबई-३२,
३. अपर मुख्य सचिव ( राजशिष्टाचार ), यांचे वरिष्ठ स्वीय सहायक, सामान्य प्रशासन विभाग, मंत्रालय, मुंबई-३२,
४. निवड नस्ती, कार्यासन-१२-अ.